**केंद्र शासनाची आम आदमी विमा योजना राज्यात राबविण्यासाठी लागणाऱ्या प्रशासकीय खर्चासाठी निधीचे वितरण.**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : आआवि-२०१०/प्र.क्र.९३/विसयो-१
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ ऑक्टोबर,२०१०.

**वाचा** :- १) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे
अ.शा.पत्र क्र.आआवि-२०१०/प्र.क्र.१४६/विसयो-२, दि.४-८-२०१०.
२) भारतीय आयुर्विमा महामंडळ, मुंबई यांचे दि.१८-८-२०१० चे पत्र.

**प्रस्तावना :** केंद्र शासनाची आम आदमी विमा योजना राज्यामध्ये प्रभावीपणे राबविण्यासाठी या योजनेंतर्गत लाभार्थी नोंदणीसाठी धडक कृती कार्यक्रम राबविण्याचे निर्देश या विभागाच्या दि.४-८-२०१० च्या अ.शा.पत्रान्वये सर्व संबंधितांना देण्यात आलेले आहेत. हा कार्यक्रम राबविण्यासाठी सर्व जिल्ह्यांना प्रशासकीय खर्चासाठी काही निधी वितरीत करण्याची आवश्यकता होती. त्यायोगे राज्य शासनाच्या प्रदानातून या योजनेच्या जिल्हास्तरीय प्रशासकीय खर्चासाठी व डेटा एन्ट्री करण्यासाठी रु.६६.०० लाख इतका निधी खर्च करण्याची आवश्यकता आहे.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाच्या आम आदमी विमा योजनेसाठी सर्व जिल्हयांनी विनंती केल्याप्रमाणे त्यांना खालीलप्रमाणे प्रशासकीय खर्च करण्यासाठी निधीची भासणारी निकड पूर्ण करण्यासाठी (प्रती जिल्हा रु.२ लक्ष प्रमाणे) रु.६६.०० लक्ष इतका खर्च करण्यासाठी शासन आदेश देत आहे. यासाठी होणारा खर्च, मागणी क्र.एन-३, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०४-ठेव संलग्न विमा योजना शासकीय भविष्य निर्वाह निधी, (००)(०१) आम आदमी योजना (योजनेतर) (२२३५ ३३८२), ५०-इतर खर्च या लेखाशिर्षामधून सन २०१०-११ या वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून करण्यात यावा. सदर खर्च केवळ निम्नलिखित बाबींसाठीच करण्याची शासन परवानगी देत आहे. याव्यतिरिक्त इतर कुठल्याही बाबींसाठी खर्च करण्याची अनुमती नाही.

अ) अर्जाची छपाई
ब) प्रशिक्षण
क) भित्तीपत्रक छपाई, प्रसिध्दी
ड) प्रवास खर्च
इ) डेटा एन्ट्री

याबाबतच्या रक्कमा सर्व जिल्हाधिकाऱ्यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत असून, त्यांनी याबाबतच्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच याप्रकरणी वेळोवेळी खर्चाच्या रक्कमांचा मेळ घाळण्याचीही दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१५/व्यय-१४, दि.१४ सप्टेंबर, २०१० च्या अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक क्रमांक - २०१०१०२७१४४४३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ग. कि. वाघ )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति
सर्व विभागीय आयुक्त, पुणे/कोकण/नाशिक/नागपूर/अमरावती व औरंगाबाद
सर्व जिल्हाधिकारी
संचालक ,लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
सर्वजिल्हा कोषागार अधिकारी
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
वित्त विभाग, अर्थसंकल्प ३ ,४, ५ अर्थोपाय व व्यय १४, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (अर्थसंकल्प) सा.न्या.सां.का.वि.स. विभाग,मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, विसयो-१